**गिरणी कामगारांची पात्रता तपासणे, सोडत काढणे, सोडतीत यशस्वी ठरलेल्या गिरणी कामगारांना घरांचा / सदनिकांचा ताबा वेळत मिळणे या बाबींवर संनियंत्रण ठेवण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- लवेसू-२०२३/प्र.क्र.१०५/गृनिप**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ मे, २०२३.

**प्रस्तावना :-**

बृहन्मुंबईतील कापड गिरण्यांच्या सन १९८२ च्या संपानंतर बंद पडलेल्या/आजारी कापड गिरण्यांच्या विक्री व विकासासंदर्भात राज्य मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार, बृहन्मुंबई विकास नियंत्रण नियमावली-१९९१ मध्ये विनियम ५८ (१) (ब) समाविष्ट करण्यात आला. तसेच बृहन्मुंबई विकास नियंत्रण व प्रोत्साहनात्मक नियमावली-२०३४ च्या विनियम ३५ मध्ये तरतूद करण्यात आलेली आहे. सदरहू तरतुदीनुसार बृहन्मुंबईतील ५८ बंद /आजारी कापड गिरण्यांची मोकळी जागा व शिल्लक चटई क्षेत्र यांचे वाटप साधारणत: १/३ हिस्सा बृहन्मुंबई महानगरपालिका, १/३ हिस्सा म्हाडा व १/३ हिस्सा गिरणी मालक यांना देण्याची तरतूद करण्यात आली आहे.

बृहन्मुंबईमधील ५८ बंद / आजारी गिरण्यांच्या जमिनीवर म्हाडामार्फत बांधण्यात येणाऱ्या घराबाबत म्हाडाने गिरणी कामगारांच्या माहिती संकलनासंदर्भात सन २०१०, सन २०११ व सन २०१७ मध्ये राबविलेल्या तीन मोहिमांमध्ये सुमारे १,७४,००० गिरणी कामगार/त्यांच्या वारसांनी गिरणी कामगारांच्या घरांसाठी अर्ज केलेले आहेत. त्यापैकी म्हाडास ताबा प्राप्त झालेल्या गिरण्यांच्या जमिनीवर उपलब्ध झालेल्या १३,४५३ घरांच्या तीन सोडती व एमएमआरडीए कडून रेंटल हौसिंग योजनेअंतर्गत प्राप्त झालेल्या २४१७ जोड सदनिकांची सोडत अशाप्रकारे चार सोडती म्हाडामार्फत काढण्यात आलेल्या आहेत.

गिरणी कामगारांची पात्रापात्रता अद्यापही निश्चित झालेली नसल्याने व विजेत्या गिरणी कामगारांपैकी काही गिरणी कामगारांना अद्यापही घरांचा ताबा मिळालेला नसल्याने या बाबींवर संनियंत्रण ठेवण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गिरणी कामगारांची पात्रता तपासणे, पात्र गिरणी कामगारांसाठी सदनिकांची सोडत काढणे, सोडतीत यशस्वी ठरलेल्या गिरणी कामगारांना घरांचा / सदनिकांचा ताबा वेळत मिळेल या बाबींवर संनियंत्रण ठेवण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| (१) श्री. सुनिल राणे, मा. वि.स.स. | - | अध्यक्ष |
| (२) श्री. कालिदास कोळंबकर, मा. वि.स.स. | - | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| (३) श्री. शिवेंद्रसिंह अभयसिंहराजे भोसले, मा. वि.स.स. | - | सदस्य |
| (४) श्री. प्रकाश आबिटकर, मा. वि.स.स. | - | सदस्य |
| (५) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा | - | सदस्य |
| (६) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य | - | सदस्य |
| (७) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ | - | सदस्य |
| (८) विषयाशी संबंधित उप मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ | - | सदस्य सचिव |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०५१६१५३९४४९९०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHAROSE M U

Digitally signed by BHAROSE M U
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=3190434d18c19984604e75eb6b24bd6955d7b2687d6684f912cc1e76df68d049, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B015B0D7AFAA0DB7C0603C5C954E6816492DBB5F94AB286DA7F224853A4EEBF, cn=BHAROSE M U
Date: 2023.05.16 15:40:21 +05'30'

**( मुं. उ. भरोसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६) सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानपरिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
७) श्री. सुनील दत्तात्रय राणे, मा. विधानसभा सदस्य, पत्ता-१४/१४, वसुधा अपार्टमेंट, डॉ. ॲनी बेझंट रोड (पूर्व), सेंचुरी मिल जवळ, प्रभादेवी, मुंबई शहर, ता. जि. मुंबई शहर ४०० ०२५.
८) श्री. कालिदास निळकंठ कोळंबकर, मा. विधानसभा सदस्य, पत्ता-५/३६, स्प्रिंग मिल्स कंपाऊड, ग. द. अंबेकर मार्ग, नायगांव, दादर, मुंबई ४०० ०१४
९) श्री. शिवेंद्रसिंह अभयसिंहराजे भोसले, मा. विधानसभा सदस्य, पत्ता-११८, सुरुचि बंगला, शुक्रवार पेठ, सातारा ४१५ ००२.
१०) श्री. प्रकाश आनंदराव आबिटकर, मा. विधानसभा सदस्य, पत्ता-१६६६, आनंद निवास, गारगोटी, ता. भुदरगड, जि. कोल्हापूर ४१६२०६
११) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहाय्यक, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अपर मुख्य सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.

१८) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१९) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.

२०) उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई

२१) उप मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई

२२) निवडनस्ती (गृनिप), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.

*-*-*-*-*-*